**सहसंचालक पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती**
**<u>देणेबाबत</u>**
**श्री. प्रशांत शामराव शिर्के, प्रकल्प संचालक,**
**जिल्हा ग्रामीण यंत्रणा, गडचिरोली**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्थाप्र २०२४ / प्र. क्र. ४२/ आस्था २**
मंत्रालय विस्तार, पहिला मजला,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांकः- २१ ऑगस्ट, २०२४

**संदर्भः**
१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. १३७ / कार्या.१२, दि. १७ डिसेंबर, २०१६
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. ५१० / कार्या.१२, दि. १६ फेब्रुवारी, २०१८
३. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना - २, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२
४. ग्राम विकास विभागाचे पत्र क्रमांक मविसे - १०२४ / प्र. क्र. २९ / २०२४ / आस्था -३, दि. १६ एप्रिल, २०२४

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०९ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेन्वये सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागातून इतर मागास बहुजन कल्याण या नवीन विभागाची निर्मिती करण्यात आली. सदर नवनिर्मित विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांसाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयाच्या आस्थापनेवर ८२१ पदांच्या सुधारित आकृतीबंधास शासनाच्या उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये मंजुरी देण्यात आली आहे. विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयातील उक्त मान्य संवर्गनिहाय मंजूर पदांवर पदभरतीच्या अनुषंगाने सेवाभरती नियम तयार करणे, तद्नंतर पदभरतीसाठी जाहिरात देऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोग व विभागातील निवड समितीमार्फत भरती प्रक्रिया राबविणे यासाठी काही कालावधी लागणार असल्याने नियमानुसार नियमित पदभरती होईपर्यंच्या कालावधीत समकक्ष वेतनश्रेणीतील पदांवर इच्छुकता मागवून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबतची कार्यवाही या विभागामध्ये सुरू आहे. त्या अनुषंगाने ग्राम विकास विभागाने संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांची सेवा विषयक माहिती उपलब्ध करून दिली असून त्यांना या विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयामध्ये प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत सहमती दर्शविली आहे.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्रमांक १ व २ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांच्या अधीन राहून श्री. प्रशांत शामराव शिर्के, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण यंत्रणा, गडचिरोली यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त इतर मागास बहुजन कल्याण

संचालनालय, पुणे यांच्या कार्यालयामध्ये **सहसंचालक** या रिक्त पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पुढील अटी / शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहेः-

१) श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांची उक्त प्रतिनियुक्ती ते ज्या दिवशी सदर पदावर रूजू होतील त्या दिवसापासून प्रथमतः तीन वर्षांच्या कालावधीसाठी, किंवा सदर पदावर नियमित अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, किंवा शासनाच्या पुढील आदेशापर्यंत यापैकी जे प्रथम घडेल तोपर्यंत असेल. तद्नंतर सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या सहमतीने वाढ करता येईल.

२) जर श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने मूळ प्राधिकाऱ्यास आवश्यक वाटली तर, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना त्यांच्या मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्याचा अधिकार शासनास राहील.

३) श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांची सेवा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास आवश्यक नसल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागास परत करण्याची मुभा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास राहील.

४) श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांनी जर आपल्या मूळ विभागाकडे परत जाण्याचा उद्देश आहे, अशी किमान ३ महिन्याची लेखी पूर्वसूचना सक्षम प्राधिकाऱ्यास /शासनास दिली तर त्यांना आपल्या मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

५) विभागाच्या आस्थापनेवरील सहसंचालक पदावर नियमित अधिकारी उपलब्ध झाल्यावर श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांची प्रतिनियुक्तीवरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

६) श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांना उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

७) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांना अनुज्ञेय असलेल्या रजा, गट विमा योजना, वैद्यकीय सवलत, रजा प्रवास सवलत इत्यादी सेवाविषयक बाबींच्या संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ विभागातील सेवाविषयक नियम लागू असतील.

८) प्रतिनियुक्ती संदर्भातील अटी / शर्ती व अनुषंगिक प्रशासकीय बाबी इतर मागास बहुजन कल्याण विभाग आणि ग्राम विकास विभाग यांच्यात विचारविनिमय करून ठरविण्यात येतील.

३. श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांना उक्तप्रमाणे प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे, अशी विनंती ग्राम विकास विभागास करण्यात येत आहे. त्यांना कार्यमुक्त करताना सक्षम प्राधिकाऱ्याने सदर अधिकारी हे निवडणूक कामकाजाशी संबंधित आहेत किंवा कसे, याची खातरजमा करूनच कार्यमुक्त करावे.

४. श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक यांना कार्यमुक्तीचे उपरोक्त आदेश प्राप्त झाल्यानंतर त्यांनी तात्काळ प्रतिनियुक्तीच्या कार्यालयात रूजू व्हावे. त्यासाठी त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास खर्च इत्यादी अनुज्ञेय असणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२११५५३४४५६३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.08.21 16:08:20 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली
४. सह सचिव /उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी (सर्व), इ.मा.ब.क. विभाग, मंत्रालय
५. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, गडचिरोली
६. अवर सचिव, (आस्था ३) ग्राम विकास विभाग, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई १
७. अवर सचिव( प्रशा २), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पुणे / गडचिरोली
९. श्री. प्र. शा. शिर्के, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, गडचिरोली
१०.प्रादेशिक उपसंचालक / सहायक संचालक (सर्व), इ.मा.ब.क.विभाग
११.मा. मंत्री ( इ.मा.ब.क. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२.प्र.सचिव ( इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती.